# महाराष्ट्र शासन

क्रमांक:- संकीर्ण-०३२३/ प्र.क्र.११८/१३स,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
मंत्रालय, विस्तार इमारत,
मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- ०२ जून, २०२३

**संदर्भ**:- १. श्री.प्रकाश आबिटकर, वि.स.स. यांचे दिनांक २४.०५.२०२२ रोजीचे पत्र.
२.राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र.रासनिप्रा/ कक्ष-११/ श्री.दूधगंगा स.सा.का.कागल/ निवडणूक / ४१२५/२०२३, दिनांक २९.०५.२०२३ रोजीचे पत्र.

## आदेश

ज्याअर्थी, श्री.दुधगंगा वेदगंगा सहकारी साखर कारखाना लि., बिद्री, ता.कागल, जि.कोल्हापूर या कारखान्याच्या संचालक मंडळाची मुदत दिनांक १०.१०.२०२२ रोजी संपुष्टात आलेली असणे, प्राधिकरणाने दिनांक १५.०२.२०२३ रोजीच्या आदेशान्वये दिनांक ०१.०४.२०२१ ते दिनांक ३१.१२.२०२२ कालावधीतील निवडणुकीस पात्र सहकारी संस्थांच्या निवडणूक प्रक्रिया सुरू करणेबाबत जिल्हा सहकारी निवडणूक अधिकारी यांना आदेशीत केलेले असणे, त्यानुसार जिल्हा सहकारी निवडणूक अधिकारी तथा प्रादेशिक सहसंचालक (साखर), कोल्हापूर यांनी श्री.दुधगंगा वेदगंगा सहकारी साखर कारखाना लि.बिद्री, ता.कागल, जि.कोल्हापूर या कारखान्याच्या निवडणूकीकरीता प्रारूप मतदार यादी व अंतिम मतदार यादी अनुक्रमे दिनांक २१.०४.२०२३ रोजी व दिनांक १७.०५.२०२३ रोजी प्रसिद्ध केलेली असणे, त्यानंतर नामनिर्देशन पत्रांच्या छाननीचा दि.१२.०६.२०२३ तर वैध नामनिर्देशन पत्रांची यादी प्रसिद्ध करणे, उमेदवारी अर्ज मागे घेणे, उमेदवारांची अंतिम यादी प्रसिद्ध करून चिन्हवाटप ह्या सर्व प्रक्रिया पूर्ण करून साधारण मतदानाचा दि.०९.०७.२०२३ असा असणे,

ज्याअर्थी, सदर साखर कारखान्याच्या मतदानाचा कालावधी दि.०९ जुलै,२०२३ असा असल्याची बाब विचाराधीन घेवून श्री.दूधगंगा वेदगंगा सहकारी साखर कारखाना कार्यक्षेत्राच्या परिसरामध्ये ७ जून नंतर मान्सूनची सुरूवात होणे व साधारणपणे पुढील ३ ते ४ महिने या परिसरामध्ये पावसाचे प्रमाण मोठ्या प्रमाणात असणे, त्यामुळे या परिसरामध्ये अतिवृष्टीमुळे महापुरसदृष्य परिस्थिती निर्माण होऊन जनजीवन पुर्णपणे विस्कळीत होवून नैसर्गिक आपत्तीस या परिसरातील शेतकऱ्यांना सामोरे जावे लागणे, कारखान्याच्या कार्यक्षेत्रामध्ये निवडणूक कार्यक्रम जाहिर झाल्यास पावसाचे प्रचंड प्रमाणामुळे कारखान्याच्या निवडणूकीकरीता अर्ज सादर करणे, माघारी घेणे, प्रचार यंत्रणा व त्यापुढे प्रत्यक्ष मतदान प्रक्रिया तसेच या दरम्यान उद्भवू शकणारी पूर परिस्थिती तसेच येथील शेतकरी खरीप हंगामाच्या शेती मशागतीमध्ये व्यस्त असल्यामुळे सभासद निवडणूक प्रक्रियेपासून वंचित राहू शकतो या सर्व भौगोलिक परिस्थितीचा निवडणूक कार्यक्रमावर परिणाम होऊ शकतो,

त्याअर्थी, कोल्हापूर जिल्ह्यातील श्री.दुधगंगा वेदगंगा सहकारी साखर कारखाना लि., बिद्री, ता.कागल, जि.कोल्हापूर या कारखान्याच्या परिसरामध्ये मान्सून पाऊस फार प्रचंड पडतो. त्यामुळे, उद्भवणारी नैसर्गिक आपत्ती, अतिवृष्टीमुळे महापुरसदृष्य परिस्थिती निर्माण होऊन जनजीवन विस्कळीत होण्याची शक्यता, त्यामुळे अशा परिस्थितीत सदर साखर कारखान्याचा निवडणूक कार्यक्रम जाहिर झाल्यास अनेक अडचणी उद्भवू शकतात, त्यामुळे, सदर कारखान्याच्या परिसरातील भौगोलीक परिस्थिती विचारात घेता महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६० मधील कलम १५७ अन्वये शासनास प्राप्त असलेल्या अधिकारात कलम ७३कक मधील तरतूदीला सुट देऊन श्री.दुधगंगा वेदगंगा सहकारी साखर कारखाना लि., बिद्री, ता.कागल, जि.कोल्हापूर या साखर कारखान्याची निवडणूक प्रक्रिया ज्या टप्प्यावर असेल त्या टप्प्यावर या आदेशाच्या दिनांकापासून दिनांक ३०.०९.२०२३ पर्यंत पुढे ढकलण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०६०२१५३६०९१४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL JAYRAM CHAUDHRY

Digitally signed by ANIL JAYRAM CHAUDHRY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D124AE9BBD15BED87DBD08EF779CF1B85A4020339EB1C2EF0E112FB67063011C, cn=ANIL JAYRAM CHAUDHRY
Date: 2023.06.02 15:37:17 +05'30'

**(अनिल ज. चौधरी)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. विभागीय सहनिबंधक / जिल्हा उपनिबंधक/ उपनिबंधक, सहकारी संस्था कोल्हापूर.
५. निवडनस्ती कार्यासन १३-स.